सेवानिवृत्त शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना शासकीय सेवेत असताना केलेल्या अत्युकृष्ट कामाबद्दल आगाऊ वेतनवाढ/वेतनवाढी मंजूर करण्याबाबत-

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्र.आवेवा-१००५/प्र.क्र. ४८ /आठ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. :- ४/६/२००५

वाचा: १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-१०६९/डी, दि.२६.६.१९७०
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-१०७२/डी, दि.११.२.१९७४
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-१०८१/१४३२/प्र.क्र.१११/ आठ, दि.२४.१२.१९८१
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-१०८९/२८२९/प्र.क्र.४०६/ आठ, दि.४.४.१९९०
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.आवेवा-१०८९/४४/प्र.क्र.१३/आठ, दि.२.६.१९९०
६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.आवेवा-१०९०/प्र.क्र.१५२/आठ, दि.२१.१०.१९९०
७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.आवेवा-१०९३/(प्र.क्र.९५/९३)/आठ, दि.४.८.१९९४

परिपत्रक

संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतुदींच्या आधारे शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना अत्यकृष्ट कामाबद्दल आगाऊ वेतनवाढी मंजूर करण्यात येतात. ज्या सेवानिवृत्त अधिकाऱ्यांना/ कर्मचाऱ्यांना त्यांनी शासकीय सेवेत असताना केलेल्या अत्युत्कृष्ट कामाबद्दल अनुज्ञेय दिनांकास आगाऊ वेतनवाढ/ वेतनवाढी मिळणे अपेक्षित होते. परंतु प्रशासकीय विलंबामुळे ते सेवानिवृत्त होईपर्यंत तत्संबंधीचे आदेश निर्गमित होऊ शकले नाहीत तर, त्यांना काही अटींच्या अधिनस्त त्यांच्या सेवानिवृत्तीपूर्वीच्या अनुज्ञेय आगाऊ वेतनवाढ/ वेतनवाढी मंजूर करण्याची तरतूद सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि.४.८.१९९४ च्या शासन निर्णयामध्ये आहे.

२. आगाऊ वेतनवाढ/वेतनवाढी मंजूर करण्यामागचा मूळ उद्देश सेवेत असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना त्यांच्या अतिउत्कृष्ट कामाबद्दल प्रोत्साहन मिळणे हा आहे. तथापि बऱ्याचदा विभागांकडून नजीकच्या कालावधीत सेवानिवृत्त होत असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना आगाऊ वेतनवाढ/वेतनवाढी मंजूर करण्यात येत असल्याचे निदर्शनास येते. त्यामुळे सेवेत असलेल्या कर्मचाऱ्यांच्या गुणवत्तेत सुधारणा करण्याचा प्रस्तुत योजनेमागचा शासनाचा हेतु पूर्णपणे साध्य होत नाही. तरी सेवानिवृत्त अधिकारी/ कर्मचाऱ्यांना आगाऊ वेतनवाढ/ वेतनवाढी मंजूर करताना सामान्य प्रशासन विभागाच्या दि.४.८.१९९४ च्या शासन निर्णयातील अटींचे पालन करण्याबाबतच्या आदेशाचे

पुनरुक्ती करण्यात येत असून सेवेत असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना डावलून सेवानिवृत्त अधिकारी/कर्मचाऱ्याला आगाऊ वेतनवाढ/वेतनवाढी मंजूर करण्यात येऊ नयेत या आदेशाचे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(स्मि. श. रानडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायलय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई,
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक(निवासी लेखे), कोकण भवन, नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सामान्य प्रशासन विभाग/का.१२, १३-अ व १४-अ,
सर्व मंत्रालयीन विभाग (सामान्य प्रशासन विभाग धरुन),
निरनिराळया मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवडनस्ती
* पत्राने